सहनिबंधक, सहकारी संस्था गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांना अपर निबंधक, सहकारी संस्था गट-अ संवर्गात पदोन्नती व पदस्थापना देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** राजस १०१३/प्र.क्र.५३/५-स
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ३२
तारीख: २१ /०२/२०१५

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक राजस१००९/प्र.क्र.८३/५-स, दि. १८/०२/२००९
२) शासन निर्णय क्रमांक राजस१०१३/प्र.क्र.४७/५-स, दि. ०३/०४/२०१३

**शासन निर्णय :**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील खाली नमुद केलेल्या सहनिबंधक, सहकारी संस्था गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांना अपर निबंधक, सहकारी संस्था गट-अ या संवर्गात तदर्थ स्वरुपात पदोन्नत करण्यात येत आहे.सदर पदोन्नत्या संपूर्णपणे तात्पुरत्या स्वरुपाच्या असून मा.उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्र.८४५२/२००४ मधील क्र. टि.ए.०१/०२/२०१४ च्या निर्णयाच्या अधिन व आरक्षण विषयक कायद्यासंबंधात मा.उच्च न्यायालयात सुरु असलेल्या याचिकेच्या अंतिम निर्णयाच्या आणि तत्सम सेवाविषयक प्रकरणाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहतील.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव, पदनाम व सध्याचे ठिकाण | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|
| १ | श्री. आर. जी. कुलकर्णी सहनिबंधक, सहकारी संस्था (गट-अ) तथा कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी ग्राहक महासंघ, मुंबई | संचालक (साखर-अर्थ) महाराष्ट्र राज्य, पुणे |
| २ | श्री.एम.आर.मोरे सहनिबंधक, सहकारी संस्था (गट-अ) तथा विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, कोकण विभाग, नवी मुंबई. | कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी ग्राहक महासंघ, मुंबई हे पद सहनिबंधक, सहकारी संस्था, दर्जातुन अपर निबंधक, सहकारी संस्था या दर्जामध्ये श्रेणीवाढ करुन त्या पदावर प्रतिनियुक्तीने |

२. उक्त पदोन्नत अधिकाऱ्यांना मा. उच्च न्यायालयात सुरु असलेल्या आरक्षण विषयक कायद्यातील तरतूदींच्या अनुषंगाने कांही बदल झाल्यास ते संबधितांना मान्य राहतील या अटीच्या अधीन पदोन्नती देण्यात येत आहे. त्यानुसार सर्व संबधित अधिका-यांनी तशा स्वरुपाचे बंधपत्र सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्याकडे प्रथम सादर करावे व नंतर पदोन्नतीच्या पदावर रुजु व्हावे.

३. श्री. मोरे यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे या काळातील प्रदाने ) नियम १९८१ मधील नियम ४० संबधी परिशिष्ट २ मधील अटी व शर्तीच्या अधीन राहून ही नियुक्ती देण्यात येत आहे. त्याचप्रमाणे परिशिष्ट-३ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावरील त्यांच्या वेतन निश्चितीसंबधीचा विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत द्यावा. असा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ मधील नियम ११ (१) (एक) खाली पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात येईल.

५. श्री. मोरे यांनी आपल्या पदाचा कार्यभार सहनिबंधक, सहकारी संस्था, सिडको, नवी मुंबई यांचेकडे सोपवून नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजु व्हावे.

६. संबधित अधिकारी यांनी रुजु अहवाल सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

७. सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील असे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२११५२४५६८७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang S Deokar

Digitally signed by Pandurang S Deokar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pandurang S Deokar
Date: 2015.02.21 15:35:35 +05'30'

**(पां.स.देवकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (सहकार/ पणन / वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,

४. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.

५. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

६. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी ग्राहक महासंघ, मुंबई.

७. सहनिबंधक, सहकारी संस्था, सिडको, नवी मुंबई, सी.बी.डी. बेलापूर

८. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण व प्रशासन)- व्दारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे,

९. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था - व्दारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

१०.सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था -व्दारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

११.महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई/ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता)

१२.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

१३.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

१४.प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक

१५.अमुस (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक

१६.अमुस (पणन) यांचे स्वीय सहाय्यक

१७. निवड नस्ती